# चिंधी

संकलन: जोसेफ जेकब्स

चित्रे: मार्गो टोम्स





समुद्रकिनारी असलेल्या भव्य हवेलीत एक वृद्ध श्रीमंत उमराव राहात होता. त्याची पत्नी आणि मुलं या जगात नव्हती. त्याला फक्त एक छोटीशी नात होती. पण त्याने तिचा चेहरा आयुष्यात कधी पाहिला नव्हता. तो तिचा तिरस्कार करत असे. कारण तिच्या जन्माच्यावेळी त्याची लाडकी मुलगी हे जग सोडून गेली होती. हवेलीतील वृद्ध दाई त्याच्याकडे तान्ही नात घेऊन आली तेव्हा त्याने शपथ घेतली की आयुष्यात कधीच तिचे तोंड कधी बघणार नाही.

मग तोंड फिरवून तो खिडकीतून बाहेर समुद्राकडे पाहू लागला आणि आपल्या मृत मुलीसाठी आसवे ढाळू लागला. शेवटी त्याचे लांब केस आणि दाढी कमरेच्या खालपर्यंत वाढून त्याच्या खुर्चीला लपेटत खाली गेली आणि फरशीच्या भेगांमध्ये रुळू लागली. त्याच्या वाहत्या अश्रुंचा ओघ समुद्राला जाऊन मिळाला.



दरम्यान, त्याच्या नातीची देखभाल करणारे कुणी नव्हते. वृद्ध दाई कधीकधी तिला खायला उरलेसुरले अन्न आणि अंगावर घालायला फाटके कपडे देत असे. हवेलीतील नोकर तिला “चिंधी” असे चिडवत, तिच्या फाटक्या कपड्यांची टिंगल करत, तिला मारहाण करून घराबाहेर हाकलत. मग चिंधी अनवाणी पायांनी रडतरडत फाटक्या कपड्यांत बाहेर जाऊन झुडपांमध्ये दडून बसत असे.

अशा रितीने चिंधी मोठी होत गेली. तिला चांगले अन्न आणि कपडे मिळत नसत. ती शेतांत आणि गल्लीबोळांमध्ये फिरून दिवस घालवत असे. फक्त एक गुराखी तिचा मित्र होता. तो आपली छोटीशी बासरी सुरेल वाजवत असे. ते ऐकून चिंधी आपली तहानभूक, थकवा, थंडी आणि साऱ्या अडचणी विसरून जात असे. ती बासरीच्या गोड सुरांवर नाचत असे. तिच्यासोबत गुराख्याचे बदकसुद्धा नाचू लागत.

एकदा लोक आपापसांत बोलू लागले की सम्राट येणार आहेत, त्यांनी शहरातील सर्व उमरावांना एका मेजवानीचे निमंत्रण दिले आहे आणि त्यावेळी त्यांचा एकुलता एक राजपुत्र आपल्या पत्नीची निवड करणार आहे.

हे शाही निमंत्रण समुद्रामार्गे वृद्ध उमरावाच्या हवेलीतही पोहोचले. वृद्ध अजूनही खिडकीनजिक बसला होता. त्याचे लांब पांढरे केस खुर्चीला लपेटलेले होते. त्याच्या डोळ्यांतून अश्रुंचा प्रवाह वाहत होता. नोकरांनी त्यांच्याकडे सम्राटाचे निमंत्रण सोपवले.

सम्राटाचे निमंत्रण पाहून वृद्धाने आपले डोळे पुसले. त्याने आपले केस आणि दाढी कापण्यासाठी नोकरांना एक मोठी कात्री आणायला सांगितली. लांब केसांमुळे तो हालचाल करू शकत नव्हता आणि जणू एक कैदी बनला होता. मग त्याने आपले किंमती कपडे आणि दागिने मागवून अंगावर घातले. सम्राटाला नजर करण्यासाठी त्याने नोकरांना आपल्या पांढऱ्याशुभ्र घोड्यावर सोने आणि रेशीम लादायला सांगितले.



दरम्यान शहरात चाललेल्या गप्पा चिंधीने ऐकल्या. आपण त्या मेजवानीला जाऊ शकत नाही, म्हणून ती स्वयंपाकघराच्या दारात बसून रडू लागली. तिला रडताना पाहून वृद्ध दाई तिच्या वृद्ध उमराव आजोबांकडे गेली आणि त्यांना विनंती केली की त्यांनी त्यांच्या नातीला सम्राटाच्या मेजवानीत सोबत न्यावे.

पण वृद्ध माणूस दाईवर चिडला आणि तिला तोंड गप्प ठेवण्यास बजावले. नोकर हसून म्हणाले, “चिंधी आपल्या फाटक्या कपड्यात खुश आहे. दिवसभर ती गुराख्यासोबत खेळत असते. तिला असंच राहू दे. हेच बरंय तिच्यासाठी.“





वृद्ध दाईने दोन-तीन वेळा चिंधीच्या आजोबांना विनंती केली की त्यांनी चिंधीला सोबत न्यावे. पण दरवेळी दाईकडे त्यांनी करडी नजर टाकली, तिला कडवट शब्द ऐकवले. शेवटी नोकरांनी दाईला मारहाण करत, शिव्या देत हाकलून दिले.

रडवेली होऊन दाई चिंधीला शोधू लागली. पण तोवर आचाऱ्याने तिला स्वयंपाकघराच्या दारातून बाहेर काढले होते. सम्राटाच्या मेजवानीस आणि नृत्य कार्यक्रमात आपण जाऊ शकत नाही, याचे आपल्याला फार दुःख होत आहे, हे सांगण्यास चिंधी गुराखी मित्राकडे गेली.

हे ऐकून गुराख्याने चिंधीला खुश करत म्हटले, “आपण दोघे मिळून सम्राटाला भेटायला शहरात जाऊ. तिथल्या छान छान गोष्टी बघू.” पण चिंधी दु:खाने आपल्या अंगावरच्या फाटक्या कपड्यांकडे आणि अनवाणी पायांकडे पाहू लागली. मग गुराखी बासरीवर मधुर सूर आळवू लागला. त्यामुळे चिंधी आपले दु:ख आणि अडचणी विसरून गेली. गुराख्याने तिचा हात पकडला आणि दोघे आनंदाने रस्त्यावरून नाचत नाचत शहराकडे कूच करू लागले.

थोडे दूर गेल्यावर घोड्यावर स्वार झालेला, सुंदर कपडे घातलेला एक देखणा तरूण त्यांच्याजवळ येऊन थांबला. त्याने सम्राटाच्या महालाकडे कोणता रस्ता जातो, असे त्यांना विचारले. तेसुद्धा तिथेच जात आहेत, हे ऐकून तो घोड्यावरून उतरला आणि त्यांच्यासोबत रस्त्यावरून चालू लागला.



काही वेळाने, गुराखी आपली बासरी काढून वाजवू लागला. तरूणाने चिंधीच्या सुंदर चेहऱ्याकडे पाहिले आणि तो तिच्या प्रेमातच पडला. त्याने चिंधीला लग्नाची मागणी घातली.

पण चिंधीने फक्त हसून सोनेरी केस असलेले आपले डोके हलवले.

“तुम्ही एका गुराखी मुलीला आपली पत्नी बनवलंत तर तुमच्या सग्यासोयऱ्यांना लाज वाटेल. रात्री सम्राटाच्या मेजवानीत कुणा उमरावाच्या मुलीला मागणी घाला. माझ्यासारख्या गरीब मुलीला त्रास देऊ नका.”

पण तिच्या नकारानंतर बासरीतून जास्त मधुर सूर निघू लागले आणि तितकाच तो तरूण चिंधीच्या प्रेमात खोल बुडू लागला. शेवटी आपल्या प्रामाणिकपणाची खात्री पटवून देण्यासाठी त्याने चिंधीला रात्री बारा वाजता मेजवानीत येण्याचे आमंत्रण दिले. त्याने तिला गुराखी आणि बदकांसोबत, अंगावरच्या फाटलेल्या कपड्यांत अनवाणीच महालात येण्यास सांगितले. तिथे तो सम्राट आणि उमरावांसमोर तिच्यासोबत नृत्य करेल आणि आपली वाग्दत्त वधू म्हणून तिचा स्वीकार करेल, असे त्याने खात्रीपूर्वक म्हटले.

मग रात्र झाली आणि महाल प्रकाश आणि संगीताने उजळून निघाला. सम्राटासमोर सर्व उमराव आणि स्त्रिया नृत्य करू लागल्या. घड्याळात बाराचे ठोके पडले तेव्हा चिंधी, गुराखी आणि त्याची बदकं यांनी महालात प्रवेश केला. ते थेट नृत्य सभागृहात गेले. त्यांना पाहून उमराव हसू लागले आणि स्त्रिया कुजबुजू लागल्या. दूरवर बसलेले सम्राट आश्चर्याने चिंधी, गुराखी आणि बदक यांच्या कवायतीकडे बघू लागले.

पण ते सिंहासनासमोर आले तसे सम्राटाच्या शेजारी बसलेला चिंधीचा प्रियकर उठला आणि चिंधीजवळ गेला. त्याने तिचा हात हातात घेऊन सगळ्यांसमोर तिच्या हाताचे तीनवेळा चुंबन घेतले आणि मग तो सम्राटाकडे वळला.

“पिताश्री!” तो म्हणाला, कारण तोच राजपुत्र होता, “मी माझ्या पसंतीची मुलगी निवडलीय. हीच माझी सहचारिणी असेल. ती या देशातली सर्वात सुंदर मुलगी आहे, आणि सर्वात गोडसुद्धा!”



राजपुत्राचे बोलणे संपण्याआधीच गुराखी मुलगा आपल्या बासरीवर एक गोड धुन वाजवू लागला. जणू काही जंगलात पक्षी गात आहे, असेच वाटू लागले. अचानक चिंधीच्या फाटक्या कपड्यांचे रुपांतर चमकदार रत्नजडीत रेशमी वस्त्रांमध्ये झाले. तिच्या डोक्यावर एक सोनेरी मुकुट दिसू लागला. तिच्या पाठीमागे असलेली बदकांची झुंड सुंदर आणि महागडे पोशाख घातलेले वराती बनले.

आपली मुलगी म्हणून चिंधीचा स्वीकार करण्यासाठी सम्राट आपल्या जागेवरून उठला. त्याचवेळी नव्या राजकन्येच्या सन्मानार्थ शाही तुतारी आणि ढोल वाजू लागले. बाहेर लोक आपापसांत बोलू लागले, “बघा! राजपुत्राने आपली पत्नी म्हणून देशातल्या सगळ्यात गोड मुलीची निवड केलीय.”

पण त्यानंतर कुणी त्या बदकांची झुंड पुन्हा कधी पाहिली नाही. त्यांचे काय झाले, हे कुणालाही कळले नाही. वृद्ध उमराव समुद्रकिनारी असलेल्या आपल्या हवेलीत परतला. कारण त्याने आपल्या नातीचे तोंड न बघण्याची शपथ घेतली होती.

तो आजही आपल्या खिडकीत बसलेला दिसतो. तुम्ही त्याला कधी भेटलात तर तुम्हाला दिसेल की तो समुद्राकडे पाहात पूर्वीपेक्षा जास्त जास्त अश्रू ढाळत आहे.



समाप्त